अर्थ व सांख्यिकी संचालनालयातील उपसंचालक-गट `अ` संवर्गातील अधिका-यांचा परिवीक्षा कालावधी समाप्त करण्याबाबत.

## महाराष्ट्र शासन

**नियोजन विभाग**

**शासन आदेश क्रमांक-ईएसटी १०१७/प्र.क्र.२८/का-१४२७**

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरू चौक,
६ वा मजला, विस्तार इमारत, मंत्रालय,
मुंबई-४०० ०३२.
दिनांक :- ११ एप्रिल, २०१७

वाचा :- १) नियोजन विभाग, शासन आदेश क्र.नामनि १११३/प्र.क्र.१८४/ का-१४२७, दि.०१.०२.२०१४
२) अर्थ व सांख्यिकी संचालनालयाचे पत्र क्र.परिवी-१४१४/उसं/२०१६/ १४/प्रशा-२/२३७, दि.१०.०२.२०१७
३) अर्थ व सांख्यिकी संचालनालयाचे पत्र क्र.परिवी-१४१४/उसं/२०१६/ १४/प्रशा-२/२७६, दि.१५.०२.२०१७

**कार्यालयीन आदेश :**

उपरोक्त संदर्भाधीन शासन निर्णयांन्वये अर्थ व सांख्यिकी संचालनालयात `उपसंचालक` पदावर ११ अधिका-यांची नामनिर्देशनाने नियुक्ती करण्यात आली आहे. सदरहू नियुक्ती आदेशात संबंधित अधिकारी दोन वर्षे परिवीक्षा कालावधीवर राहतील, असे नमूद करण्यात आलेले आहे.

२. त्यांच्या नियुक्ती आदेशात नमूद केल्याप्रमाणे, दोन वर्षांच्या कालावधीत विहित विभागीय परीक्षा (जर काही असल्यास) आणि संगणक हाताळणी परीक्षा उत्तीर्ण होणे आवश्यक होते. तसेच, हिंदी, मराठी भाषा परीक्षा उत्तीर्ण होणे किंवा त्यातून सूट मिळणे आवश्यक होते. त्याप्रमाणे खालील नमूद अधिकाऱ्यांना सदर परिक्षा उत्तीर्ण होण्यापासून सूट देण्यात आली आहे.

३. सदरहू दोन वर्षाच्या परिवीक्षा कालावधीत परिवीक्षा अधिका-यांनी जर रजा उपभोगलेली असेल, तर त्या रजेच्या कालावधीएवढा परिवीक्षा कालावधी शासन परिपत्रक क्र.५३४६/४६, दि.२६ ऑगस्ट, १९५२ नुसार वाढविणे आवश्यक आहे.

४. उपसंचालक-गट `अ` संवर्गात उपरोक्त आदेशान्वये नियुक्त करण्यात आलेल्या अधिका-यांच्या संदर्भात, विहित अटी व शर्तीची पूर्तता होत असल्याने तसेच सदर अधिकाऱ्यांनी त्यांचा परिविक्षाधीन कालावधी समाधानकारकरित्या पूर्ण केला असल्याने त्यांनी उपभोगलेल्या रजा विचारात घेऊन परिवीक्षाधीन अधिका-यांचा पुढील विवरणपत्रात त्यांच्या नावासमोर दर्शविलेल्या दिनांकास परिवीक्षा कालावधी संपुष्टात आणण्यात येत आहे व सदर पदावर त्यांची नियमित /स्थानापन्न नियुक्ती करण्यात येत आहे :-

| अ.क्र. | परिवीक्षाधीन अधिका-याचे नांव | नियुक्ती दिनांक | परिवीक्षा कालावधी संपुष्टात आल्याचा दिनांक |
|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ७ |
| १ | श्री.मि.भा. नारिंगे | ०१.०३.२०१४ | २९.०२.२०१६ |
| २ | श्रीमती म.पं.देशपांडे | ११.०३.२०१४ | २०.०४.२०१६ |

| अ.क्र. | परिवीक्षाधीन अधिका-याचे नांव | नियुक्ती दिनांक | परिवीक्षा कालावधी संपुष्टात आल्याचा दिनांक |
|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ७ |
| ३ | श्रीमती सं.चं.दिक्षीत | ११.०३.२०१४ | २०.०५.२०१६ |
| ४ | श्रीमती तृ.प्र.बापट | २८.०२.२०१४ | १३.०४.२०१६ |
| ५ | श्रीमती शि.अ.पांडे | २६.०२.२०१४ | ०५.०४.२०१६ |
| ६ | श्री.कि.बा. जोशी | ०१.०३.२०१४ | १७.०३.२०१६ |
| ७ | श्री.स.वि.मुळे | ०३.०२.२०१४ | ०२.०२.२०१६ |
| ८ | श्री.हे.बा. अहिरे | ०२.०३.२०१४ | ०६.०४.२०१६ |
| ९ | श्रीमती नि.रु.पाटील | १७.०२.२०१४ | १३.०४.२०१६ |
| १० | श्री.सु.झि. जाधव | ०१.०३.२०१४ | २९.०२.२०१६ |
| ११ | श्री.ग.रु. वायाळ | ०१.०३.२०१४ | २२.०३.२०१६ |

५. हे शासन आदेश सामान्य प्रशासन विभाग, शासन परिपत्रक क्र.एसआरव्ही-१०९४/ १८३७/ प्र.क्र.१८/९५/आठ, दि.२८ मार्च, १९९५ नुसार सूचना लक्षात घेऊन तसेच सामान्य प्रशासन विभाग, शासन परिपत्रक क्र.परिवि २७१५/प्र.क्र.२०३/आठ, दि.२५ ऑगस्ट, २०१५ अन्वये निर्गमित करण्यात येत आहे.

६. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०१७०४१११२५७५१९११६ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Priyanka Ranjan Chhapwale

Digitally signed by Priyanka Ranjan Chhapwale
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Planning Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=2295c5c50b6a2aa03b2654fd2f5f69a709a20ae443 59c483f3e1b0d4450728d0, cn=Priyanka Ranjan Chhapwale
Date: 2017.04.11 15:12:24 +05'30'

**( प्रियांका रं.छापवाले )**
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रति,**

१) संचालक, अर्थ व सांख्यिकी संचालनालय, मुंबई.
२) सहसंचालक, प्रादेशिक कार्यालय, अर्थ व सांख्यिकी संचालनालय, कोकण विभाग, नवी मुंबई/नाशिक/पुणे/नागपूर/अमरावती/औरंगाबाद.
३) उपसंचालक (प्रशा.), अर्थ व सांख्यिकी संचालनालय, मुंबई
४) उपायुक्त (नियोजन), विभागीय आयुक्त कार्यालय, कोकण विभाग, नवी मुंबई/नाशिक/पुणे/नागपूर/अमरावती/औरंगाबाद.
५) संबंधित अधिकारी (अर्थ व सांख्यिकी संचालनालयामार्फत).
६) निवडनस्ती.